GR-2004072917391M1001 – 1100.

**विद्युत अधिनियम, २००३ अन्वये महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाची पुनर्रचना करण्यासाठी सल्लागार संस्थेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाची गुणवत्ता व त्यांनी दिलेल्या किंमती ठरविण्याचा अंतिम निर्णय घेण्यासाठी मूल्य मापन समितीची नियुक्ती**

महाराष्ट्र शासन

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्र.इएलए १००३/प्र.क्र.८५८८/ऊर्जा-५

दिनांक-८.१०.२००३.

प्रस्तावना:-

विद्युत अधिनियम, २००३ मधील तरतूदीनुसार महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळाचे अस्तित्व दि.१० जून, २००४ पर्यन्तच रहाणार असून त्यापूर्वी मंडळाची पुनर्रचना करणे आवश्यक आहे. यासाठी शासनाने दि. १७ व २० सप्टेंबर,२००३ रोजी खालील ७ सल्लागार संस्थांना आमंत्रित करण्यात आले होते.

(१) मे. प्राईस वॉटर हाऊस कूपर प्रा.लि.,

(२) मे.डेलॉईट हास्किन्स ॲन्ड सेल्स.

(३) मे.एस.बी.आय.कॅपिटल मार्केटस् लि.,

(४) मे.फिडबॅक वेंचर्स प्रा.लि.,

(५) मे.टाटा कन्सलटन्सी सर्व्हीस.,

(६) मे.के.पी.एम.जी. इंडिया प्रा.लि.,

(७) मे.अर्न्स्ट ॲन्ड यंग प्रा.लि.,

२. यापैकी खालील तीन सल्लागार संस्थांची अंतिम प्रस्ताव देण्यासाठी निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

(१) मे. प्राईस वॉटर हाऊस कूपर प्रा.लि.,

(२) मे.के.पी.एम.जी.इंडिया प्रा.लि.,

(३) एस.बी.आय.कॅपिटल मार्केटस् प्रा. लि.,

याबाबत अंतिम निर्णय घेण्यासाठी राज्य पातळीवर मुल्य मापन समितीची नियुक्ती करण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

राज्य शासनाने असा निर्णय घेतला आहे की, या तीन सल्लागार संस्थामधून त्यांच्या प्रस्तावाची गुणवत्ता तसेच त्यांनी दिलेल्या किंमती, याचा विचार करून अंतिम निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे मूल्य मापन समितीची नियुक्ती करण्यात येत आहे.

(१) सचिव (ऊर्जा) — अध्यक्ष.

(२) सचिव (वित्त) लेखा व कोषागार. — सदस्य.

(३) डॉ. अशोक हरणे, मुख्याधिकारी (आयएलएफएस) — सदस्य.

**समितीची कार्यकक्षा**

सदर तीनही सल्लागार संस्थाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाची गुणवत्ता, छाननी व त्यांनी दिलेल्या किंमती याचा विचार विनिमय करून उपरोक्त समिती अंतिम निर्णय घेईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र.ना. अंबरित)

शासनाचे उप सचिव.